# महाराष्ट्र शासन

फोन नं. २२०२६९१३
फॅक्स नं. २२८८६०२४

क्रमांक :- अनुदा-२०११/(प्र.क्र.१५१/११)/का.-२३
विधी व न्याय विभाग,
मंत्रालय, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई ३२.
दिनांक :-०४ ऑक्टोबर, २०११.

विषय : पुनर्वाटपाद्वारे जिल्हा व सत्र न्यायाधीश, भंडारा यांना अतिरिक्त निधी उपलब्ध करुन देणेबाबत ,१३-'कार्यालयीन खर्च'

संदर्भ: १) शासन ज्ञापन विधी व न्याय विभाग क्र. अनुदा-२०१४/(दत्तमत)/(प्र.क्र.१०७/११) /का.२३, दि.१३ जून,२०११

२) जिल्हा व सत्र न्यायाधीश, भंडारा यांचे जा.क्र. क-१(१)/३७७४/१९९३, दि.२१/०९/२०११ चे पत्र.

ज्ञापन :

जिल्हा व सत्र न्यायाधीश, भंडारा यांना जिल्हा गोंदिया येथे नव्याने दि. २७/०२/२०११ ला स्थापन झालेल्या प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, गोंदिया व मुख्य न्यायादंडाधिकारी, गोंदिया या दोन्ही न्यायालयांसाठी खरेदी केलेल्या झेरॉक्स मशीनचे प्रलंबित देयक अदा करण्यासाठी १३-'कार्यालयीन खर्च' या उद्दिष्टांतर्गत अतिरिक्त अनुदानाची आवश्यकता असल्याने खालीलप्रमाणे शासन ज्ञापन निर्गमित करण्यात येत आहे.

२. सन २०११-१२ या वित्तीय वर्षासाठी "मागणी क्र. जे-१, २०१४ न्यायदान (दत्तमत) १०५(०२)(०१) जिल्हा व सत्र न्यायाधीश (२०१४ ०१७२)" या मुख्य लेखाशीर्षाखालील जिल्हा व सत्र न्यायाधीश, गोंदिया यांच्या १३-'कार्यालयीन खर्च' या उद्दिष्टाखालील मंजूर अनुदानातून रु २,६२,०००/- एवढी कपात करून त्याच मुख्य लेखाशीर्षाखालील जिल्हा व सत्र न्यायाधीश, भंडारा यांना १३-'कार्यालयीन खर्च' या उद्दिष्टांतर्गत रु २,६२,०००/- इतकी वाढ करण्यात येत आहे.

या आदेशानंतर जिल्हा व सत्र न्यायालय, भंडारा व जिल्हा व सत्र न्यायाधीश, गोंदिया यांना सन २०११-१२ या वित्तीय वर्षाच्या प्रथम नऊमाहीसाठी मंजूर केलेल्या सुधारित अनुदानाचा तपशील खालीलप्रमाणे राहील.

( रुपये हजारात)

| क्र. | कार्यालय | १३- कार्यालयीन खर्च | | |
|---|---|---|---|---|
| | | वितरीत अनुदान | फेरवाटप | फेरवाटपानंतरचे अनुदान |
| १ | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, भंडारा | १८०८ | (+) २६२ | २०७० |
| २ | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, गोंदिया | १७९६ | (-) २६२ | १५३४ |
| | एकूण | ३६०४ | ० | ३६०४ |

३. उपरोक्त तपशीलातील पुनर्वाटपाद्वारे उपलब्ध करून दिलेले अनुदान ज्या प्रयोजनांसाठी उपलब्ध करून देण्यात आले आहे, त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

४. नियंत्रक अधिकाऱ्यांनी वरीलप्रमाणे सुधारित अनुदान विचारात घेऊन कृपया खर्च नियंत्रित करण्यात यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(वि. श्री. पाटील)
कार्यासन अधिकारी

प्रत, माहितीसाठी व आवश्यक त्या कार्यवाहीसाठी अग्रेषित :-
मा. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने)
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा)-एक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा)-दोन, महाराष्ट्र राज्य, नागपूर
प्रमुख न्यायाधीश, जिल्हा व सत्र न्यायालय, भंडारा/गोंदिया
जिल्हा कोषागार अधिकारी, भंडारा/गोंदिया
वित्त विभाग (अर्थसंकल्प ११, व्यय-६, अर्थोपाय)
विधी व न्याय विभाग (का.१२,का.२४,का.७)
(का.७ यांना विनंती करण्यात येते की सदरहू ज्ञापन संगणकावर अपलोड करण्यात यावे.)
निवड नस्ती.